2015042312074222227 09400527

पळस खारभूमी योजना ता.रोहा, जि.रायगड
प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- खाभूयो २००८/(५२७/२००८)/ खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २७/०५/२००९.

पहावे :- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्रमांक ३८०६/खाभू/पळस/तां१/६८५२, दिनांक २०.११.२००८.

प्रस्तावना :-

पळस खारभूमी योजना ता.रोहा, जि.रायगड ही योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. सदरची योजना बोर्डकालीन योजना आहे. सततची भरती ओहोटी व अतिवृष्टीमुळे बांधांचे मोठे नुकसान झाले आहे. तसेच उघाडया पूर्णपणे नादुरूस्त झालेल्या आहे. सदर योजनेचे अंदाजपत्रक सन२००७-०८ च्या वर्षाच्या दरसूचीवर आधारित, प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी शासनास सादर केला होता. तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

पळस खारभूमी योजना ता.रोहा, जि.रायगड या योजनेस सन २००७-२००८ च्या दरसुचीवर आधारित, प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये २,०८,२८,८२८/- (रूपये दोन कोटी, आठ लक्ष, अठ्ठावीस हजार, आठशे अठ्ठावीस फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये १,८९,८०,७५३/- व रूपये १८,४८,०७५/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे योजनांतर्गत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००६/प्र.क्र.(८२/०६) विनियम दि.१३.३.२००७ मधील तरतूदीनुसार आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (३०/२००९) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रा.च.हुमणे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आतंर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे (सोबत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण विभाग, पेण, जि.रायगड
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २००८/(५२७/२००८) खारभूमी दिनांक २७/०५/२००९ चे सहपत्र
पळस खारभूमी योजना ता.रोहा, जि.रायगड अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | बाब | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | ४३७६७ |
| २ | "ब" (भूसंपादने) | ५००००० |
| ३ | "सी" मुख्य कामे | १०७३६२९२ |
| ४ | "एफ" उघाडी काम | ३७७६०३६ |
| ५ | "के" इमारती | ५००००० |
| ६ | "एम" वृक्षारोपन | २४१८ |
| ७ | "ओ" संकिर्ण | १००००० |
| ८ | "पी" देखभाल | १००००० |
| ९ | "आर" दळणवळण | ३२२२२४० |
|  | कामाप्रित्यर्थ किमत | १८९८०७५३ |
|  | अनुषंगिक खर्च (भूसंपादन किमत वगळून १० टक्के) | १८४८०७५ |
|  | **एकूण** | २०८२८८२८ |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| पुनःप्रापित क्षेत्र | २०० हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | १०४१४४ < ११८७५० मापदंडात बसते |
| लाभव्यय गुणोत्तर) | २.५३ > १.०० मापदंडात बसते |
| दरसूची वर्ष | २००७-०८ |

G:\Maahegoen-order-HIP..doc